॥ श्री ॥

# फल्गुनाऽहंकृतिशम.

हें निरूपण

मा० रा० रा० वासुदेव रंगनाथकवि अंबेकर
यानी रचिलेलें तें, त्यांचेपुत्र रा.
रा. गोविंद कवि यानी,
उपयुक्त असेंजाणून
प्रशिद्धीस आणिलें,



तंजावर.

"पूर्णचंद्रोदय" छापखान्यांत छापिलें.



१८९१.



कि० आणे २.

# कथाशय.

श्रीकृष्णाचा सखा अर्जुन नारदादिष्ट नियमभंगदोष परिहरिणेर्थ तीर्थे फिरत फिरत वाटेंत श्रीशंकरास गांठून, निजबळें हर्षविताझाला. त्यासमयीं ईश्वर संतुष्ट होऊन, कवचादिक पार्थास देताझाला. तदनंतर ते अंगीकरून तेथून सेतुबंधासमीप पातला.

तेव्हां तेथें मारुती श्रीरामध्यानस्थ ऐसा पाहून, त्यास गुरु व आईबाप यांचें आणि तवनाम कोणतें असें पुसतां, मारुतीनें स्वगुरु श्रीरामचंद्रप्रताप आणि पाषाणीं सेतुबंध इत्यादि कीर्ति आनुपूर्वे वर्णिली. ती ऐकून गर्वित पार्थ, दाशरथी श्रीरामाची समता आपण मानून, प्रतिज्ञापूर्वक अभंगअसा शरसेतु रचिता झाला. तेव्हां श्रीरामभक्त मारुतीनें त्याचा भंग केला.

पूर्व संकल्पितनियमास आंवला गर्वरहित पार्थ जोतो पावक प्रज्वलित करून, त्यांत प्रवेश करिणेस उद्युक्तहोतेसमयीं, करुणा भाकितां भक्तप्रेमळ भगवंत अतिवृद्धरूपें प्रगटून उभय भक्तांचें सांत्वन करिणेनें निजबिरुद सांभाळिताझाला.

ही कथा \श्रीहरिविजयाच्या आशयावरून रचिली. यांत कांहीं स्थलविशेषीं त्यांतीलकित्येक उपयुक्त ओंव्या वेंचूनघेति-

ल्या आहेत. त्याजाग्यावर ओंवी ग्रंथाची असें समजणेर्थ ( ग्रं० ) अशी खूण केलीआहे.

यास "फल्गुनाऽहंकृतिशम" असें अभिधानहीं दिलें आहें.

गीति.

प्रसरिन जोडिन भावें कृति मान्या चेलपल्लव करां हो ॥
प्रार्थक मीं मागतसें मजवरि साधू कृपा लव कराऽ हो ॥

आपला

गोविंदवासुदेव कवि अंबेकर.

श्री

॥ श्रीलक्ष्मीवेंकटेशप्रसन्न ॥

# फल्गुनाऽहंकृतिशम

## प्रारंभ.



पद.

कृष्णपदास भजा ॥ साधुहो ॥ ध्रु० ॥ कर्ता कारण कार्यहिं जो जगिं ॥ अव्यय जनक अजा ॥ सा० ॥ १ ॥ पुरुषार्थांतें वितरूं वागवि ॥ या जानें चार भुजा ॥ सा० ॥ २ ॥ वासुदेवविभु लीला बरवी ॥ तत्स्तु-वर्णाच सजा ॥ सा० ॥ ३ ॥ १ ॥

शार्दूलविक्रीडित.

देवांचा यजमान भाविकजनां दे वांछितातें क्षणीं ।
जीवा शाश्वत सौख्य वी बहुत राजीवाक्ष सद्वीक्षणीं ॥
पर्वाब्जानन जो कदापि न सहे गर्वामती या जनीं ।
सर्वातीत तया भजा निशिदिनीं सर्वांसि भावें मनीं ॥२

गीति.

इंद्रप्रस्था येतां नारद पांडवि बरोपचारांनीं ॥

ानीं जेंविंप्रभु पूजियला सदय सद्विचारानीं ॥ ३ ॥
काथि मासद्वय इनदिन हे सेवोच येक भावास ॥
त्रास करी कीर्ति श्री ममता अचुक सत्स्वभावास ॥ ४ ॥
ष्णवर्त्मशुद्धा कृष्णा ग्राह्या च अन्यभावानें ॥
रिं वर्ता सारे सारें अघ साधुजनक्षभा वाने ॥ ५ ॥
ाह्म मुनि असें त्यां आज्ञापुनि होय ससुख चि खलीन ॥
खलीन सतिशि, मग त्या भावामधें खलखली न ॥ ६ ॥
ाननतनयोक्तें कृष्णा दे शर्म धर्मरायासी ॥
तवँधारिं भाऊ मातेधारिं वदति चौंजणां यांसी ॥ ७ ॥
पार्था विप्र वदे धांवत येवोनि देत बहु धापा ॥
ाळीं गाई मम असुरीं नेल्या हृणीत विविधा पां ॥ ८
प्रपालधर्मचि शर्मद तव कुलीं नच बुडावा ॥
सधर्म साशुग कराहिं करो स्वाश्रृतांप्रति कुडावा ॥ ९ ॥

भुजंगप्रयात.

तदां पार्थ सावेश सक्रोध भृत्यां ।
वदे चाप आणा पहा बाणकृत्या ॥
क्षणीं राक्षसव्रात होवी फरारी ।

जनीं तोष लाहेल तेणें मुरारी ॥ १० ॥

ओंवी. ( ग्रं० )

सेवक ह्मणती पार्थाप्रती ।
धर्म द्रौपदी आहेत येकांतीं ॥
संकट पडिलें निश्चितीं ।
पार्थवीरासी तेधवां ॥ छ ॥

शार्दूलविक्रीडित.

एकाकी सदनीं रिघे त्यजुनियां धाकामती पार्थ तो ।
जों काढी शर चाप गोहर तयां हाकारुनी क्षिप्र तों ॥
दुष्टां शिक्षुनि त्या द्विजासि वितरी इष्टार्थ गायी भल्या ।
हृष्टा क्षीरतृणादनें बहुपरीं पुष्टा तदां शोभल्या ॥ ११ ॥

गीति.

साग्रज सव्रीड स्त्री येकांतीं जाहली मदागमनें ॥
जाणोनि, पण्डितां तो पुसे प्रतीकार त्यां तदाग मनें ॥ १२ ॥
बालहृदया हरू बहुतीर्थाटन दान धर्म करिशील ॥
तरशील\द्विज वदती तेणें अतुला सुकीर्ति वरिशील ॥ १३ ॥
द्विजधर्मानुज्ञेनें तापसवेषें फिरे धवलवाहो ॥

चिंती नाणो चित्ता मंतूच्या धर्मबांधव लवा हो ॥ १४ ॥
तीर्थे नद्या तटाकादिक पर्वत सर्वदेशहीं फिरला ॥
बाराज्योतिर्लिंगां वंदुनि काम्यकवनीं तदां शिरला ॥ १५ ॥
श्रृतजनशंकर शंकर करिता जेथें सदां अनुष्ठानें ॥
त्या आसनीं वसविलें ठाणें पार्थें तदेकानिष्ठानें ॥ १६ ॥

स्त्रग्विणी.

पार्वतीनाथ तों त्या पुसे तापसी ।
माझिये स्थानकीं बैसुनी तापिशी ॥
कोण तूं सांग रे भीड कांहीं मनीं ।
नेणत्या, या वरी दंडितों मीं मनीं ॥ १७ ॥

गीति.

अर्जुन त्याप्रति बोले वर्जुनि धाकासि तो समरधीर ॥
तर्जिशि कां स्थल न तुझें जर्जर बाणीं करीन हो स्थीर ॥ १८ ॥
दंडों थापटुनी घे गांडीवा शीघ्र सव्यसाची तो ॥
मांडी ठाण शिवावरि ओढी सेषुहि चिला कसाची तों ॥ १९ ॥
हराशिरिं शरभर सरसर वरवर वर्षा च नीरधर धारा ॥
शूराग्रगण्य तैसा अर्जुन गर्जुन पराक्रमा धारा ॥ २० ॥

धृतशाण तीक्ष्ण बाणां सणसण सोडी तयावरि पिनाकी ॥
टाकी अग्न्यस्त्रातें यत्तापम्लान कीं विटपि नाकीं ॥ २१ ॥

शालिनी.

पर्जन्यास्त्रा पार्थ सोडोनि वारी ।
शक्त्यस्त्रातें पाठवी तों पुरारी ॥
छोडी त्या तैं कृष्ण तो कार्तवीर्यें ।
कृष्णाचा जो दास त्यासाच धैर्यें ॥ २२ ॥

विद्युन्माला.

सारीं अस्त्रें शूली सोडी ।
प्रत्यस्त्रानीं जिष्णू तोडी ॥
ऐशी होतां बाणाबाणी ॥
शंभू पार्था तोषें वानी ॥ २३ ॥

चामर.

धन्य तूंचि येक वीर तोषपावलों वरा ।
नाम स्वूप सांग्र सांग देतसें तुला वरा ॥
तों वदेच पंडुपुत्र पार्थ मीं सदाशिवा ।
दोष हे क्षमीं समग्र दे कृपानिधे शिवा ॥ २४ ॥

गीति.

आणिकनामें ऐकें फल्गुन कृष्णाहिं धनंजय किरीटी ॥
शंभू तैं आनंदें भूषवि त्या कवचकुंडलकिरीटीं ॥ २५ ॥

मालिनी.

मग विजय चि पावे दक्षिणासागरासी ।
प्रणुति करि सुभावें मुख्य रामेश्वरासी ॥
तवँ निरखि पृथेचा सूनु तो वीर्यराशी ।
पुरहर-सख-राम-ध्यान-दत्ताऽदरासी ॥ २६ ॥

धुपद.

पार्थ त्यासि पुसे मात ॥
मातें गुरु कथीं तात ॥
आतां निगदीं स्वहेत ॥
आवघाचि वेगीं ॥ ध्रु० ॥

सांग तुझें नांवासि ॥
सत्यवान् पृथासुतासि ॥
तूं गा गणिं बली अधीशि ॥
थोर कीर्तिशाली ॥ पार्थ० ॥ २७ ॥

शार्दूलविक्रीडित.

माझा श्रीगुरु रामचंद्र, जनिता वायू, भली अंजना ।
माता, नामहि मारुती, सरस हें मानीं पृथानंदना ॥
सीताशुद्धि कथोनि सेतु रचितां म्यां आणिलें पर्वतां ।
आतां त्यास्तव पाहतां गमतसे कायीं बहुश्रांतता ॥ २८ ॥

स्वागता.

येक बाण वनिता वच ज्याला ।
त्या कृपानिधिसुपादकजाला ॥
ध्यातसें ससुख मीं, सुर गाती ।
यत्सुकीर्ति भुवनीं अनघा ती ॥ २९ ॥

अमृतध्वनी.

श्रीरापुढें वदमि तोग जगत्प्रथित शूरांत तो ह्मणउनी ।
वीरा नरासमचि जो राजयांत निजतीरांकडोनिच जनीं ॥
कां सेतुबंधन न भासे तया ह्मणुनि हांसे तदां हृत मदीं ।
ऐसें तदुक्त परिसे तों वदे रघुजदासेव्य भीम वरधी ॥ ३

शार्दूलविक्रीडित.

तीरीं सेतु करी परीं करिपरीं भारीरिसीं वानरीं ।

जोरीं थोर गिरी करीं सुसमरीं तों आणितांलौकरी ॥
डोले वास्तव राघवेंद्र न रची जो लेखवर्याग्रणी ।
बोलें व्यर्थचि काय त्यासदृश जें चालेल शूरीं मणीं ॥ ३१ ॥

द्रुतविलंबित.

हसुनि पार्थ वदे कपिराजया ।
दिसवितों शरसेतुस आज या ॥
बल जगीं नवजायचि मापलें ।
ह्मणसि तें प्रगटीं ह्मणि आपलें ॥ ३२ ॥

पृथ्वी.

धनंजयिं धनंजया सुशरसेतु भंगे तरी ।
करीन कपिराजया समज निश्चयो अंतरीं ॥
जरी नघडलें तसें बसावें मध्वजीं आपणा ।
पणाप्रति कथीं ह्मणी करिन मीं शरारोपणा ॥ ३३ ॥

ओंवी. (ग्रं०)

हनुमंत ह्मणे मजतों नाहींमरण ।
जरि सेतु नमोडे माझेन ॥
तरीं मीं तुझे ध्वजीं बैसेन ।

तुज आधीन होवोनियां ॥ छ ॥

गीति.

ऊदें कृशानु खवळे कपी तसा निगादि सत्य होऊंदे ।
ऊदे हरीशि गर्वी समरांगर ससुख काय हो ऊदे ॥ ३४ ॥

गांडीव गवसणीहुनि काढी ओढी चिलेसि आकर्ण ॥
आकर्णुनि तद्घोषा दचके हृदयांत तोहिं गोकर्ण ॥ ३५ ॥

शरगण सरसर सोडुनि सम योजन सेतु तवँ रची पार्थ ॥
हावा न अशाभावें मंदरसत्मांशु दृढतर अपार्थ ॥ ३६ ॥

ओंवी.

पार्थम्हणे कपिरायासी ।
तूझीआंगवण दावीं यासि ॥
मन नठेवीं आयासीं ।
तैं विजयासि वानिस्री ॥ ३७ ॥

गीति.

श्रीरामा जयरामा जयजयरामा चि अंजनातनय ॥
गर्जुनि शरसेतुनिकट आला सोल्लास भीम वितनय ॥ ३८

शार्दूलविक्रीडित.

पुच्छातें अपटी कशी कपि कटी मांड्या भुजा थापटी ।
रोवीपांय बळेंचि भूतळवटीं उड्डाण घे नेहटीं ॥
भारी भीमरवें वरी गडगडी घाली जवें जें उडी ।
झोडी तो शरसेतु तों कडकडी पार्थो वळे वेंगडी ॥ ३९ ॥

गीति.

सत्यव्रता सुवृत्ता व्याली धन्याचे धनुर्धरा कुंती ॥
पणचालवि वातात्मज वदे, गमे अर्जुना प्रहर कुंतीं ॥ ४०

अभंग.

तवँ चिंती पार्थ ॥ वरुनी गर्व मोटा ॥
अवमानाच्या मोटा ॥ बांधीयेल्या ॥ १ ॥
कैसें म्या वागावें ॥ कोणता उपाय ॥
यासि करूं काय ॥ नसुचेचि ॥ २ ॥
केवळ चंचल ॥ तळमळी चित्त ॥
जवें बोधी उचित ॥ कोणआतां ॥ ३ ॥
वासुदेवस्तुत्य ॥ तयासि भजतां ॥
दासां सुखवील ॥ सांभळी तों ॥ ४ ॥ ४१ ॥

पंचचामर.

शुचि प्रबोधवोनि पार्थ जों करी प्रदक्षिणा ।
श्रुतार्ति वारका स्मरे सुभाव त्या कृपाघना ॥
अनाथनाथ दीनबंधु आजि सख्य राखितां ।
अह्मां घडे तरीच भद्र अर्थ जाण जाणता ॥ ४२ ॥

पद.

श्रीहरी धांवँ पाव लवकरी ॥ ध्रु० ॥ वेळींया कळवळून ॥ वरदा सांभाळी कवण ॥ तुझवीण या भवांतरीं ॥ धां० ॥ १ ॥ ग्रासुनियां दावानल ॥ गतभी केले गोवळ ॥ पार्थ बाळ राखीं त्यापरीं ॥ धां० ॥ २ ॥ राखुनियां मीपण ॥ नकळत केला म्यां पण ॥ ये आपण पतित उद्धरीं ॥ धां० ॥ ३ ॥ वंद्या दावीं चरण ॥ वासुदेव दयासदन ॥ कुंदरदन सख्य आदरीं ॥ धां० ॥ ४ ॥ ४३ ॥

गीति.

गजराजादिक गर्वी पाळियले त्वां तसां प्रणतलक्षीं ॥
गणि मज प्राणविसांव्यां कळवळुनी ये दयाभरें लक्षीं ॥ ४४ ॥

साकी.

माझ्या कान्हा सखया ये ॥ मानसिं धरिं सोय ॥ ध्रु० ॥

मारुति हा आति बलाढ्य नेणानि ॥ मजला होता ताव ॥ सारा टळला सारसनयना ॥ सांभाळाया पाव ॥ माझा० ॥ १ ॥
माता रुसली बाळावरुतें ॥ मच्छालागि तोय ॥ गति यापरिची कायकर्मों ॥ तुंवां नयेतां होय ॥ माझा० ॥ २
वासुदेव नुत वससि जवळि तरिं ॥ जीवांहि माझा धाय ॥ वरदा भवदाऽकृती वरोनी ॥ कुरवाण्डिन मीं काय ॥ माझा० ॥ ३ ॥ ४५ ॥

भजन.

मुरळी धारी ॥ मनमोहन कुंज विहारी ॥ ४६ ॥

ओंवी ( ग्रं० )

तों द्वारकेसी जगन्नाथ ।
कळलें संकटीं पडिला पार्थ ॥
भक्तकैवारी रमाकांत ।
आला धांवत सेतुबंधीं ॥ छ ॥

शुद्धकामदा.

भजन यापरीं पार्थजों करी ।
अजित आणुनी आद्य तो हरी ॥

व्रजजनार्तिहा वृद्धता वरी ।
सजव येवुनी संकटा हरी ॥ ४७ ॥

पद

नकळे माया कृष्णाची ॥ ध्रु० ॥ ज्यायाचिति श्रुति गुज-
उमगाया ॥ सायासांचि सुर जया पहाया ॥ मुनिगण-
ध्येया ॥ कृष्ण० ॥ १ ॥ मायाळू परिहरि श्रुतताया ॥
जे या नरासि शिण वाराया ॥ रची उपाया ॥ कृष्णा ० ॥२॥
त्या यादवकुलभूषा सुनया ॥ ध्येया वासुदेव वरसदया ॥
चित्सुख ठाया ॥ कृष्णा० ॥ ३ ॥ ॥ ४८ ॥

शार्दूलविक्रीडित.

खालें रोवुनि वेणुदण्ड लवुनी चाले हले मान ते ।
डोले फार पदोपदीं च बहुधा श्रोलेंहि घे मागुतें ॥
बोले त्यांप्रति वृद्ध कायकरितां चालेल तें सांगिजे ।
त्या लेखोत्तमरामभक्त निगदो भोळपणें तथ्य जें ॥ ४९ ॥

गीति.

आपण पुण कल्पोनी गुणगुणित्या या अयोग्य कातरता ॥
कातरता सतु न जरि होय पृथासुत शिर्णी न कां तरता ॥५०॥

स्त्रग्धरा.

साक्षी या कोण सांगा उभयमत तदां कोंवि तें कोण लक्षी।
अक्षीं दावा तयासी नतरि वसतसें मींच हो या द्विपक्षीं ॥
आतां माता मदीया परिसुनिच पुन्हां कल्पिजे स्वीयधर्मा।
मर्मा जाणोनि दोघे मणति तव मता मानितों दे सुशर्मा॥५१॥

ओंवी. (ग्रं०)

मारुति वदे पृथाकुमरा ।
साच सांगे हा माथारा ॥
मानूं याच्या धार्मिक गिरा ।
पण पूरा मग रचीं ॥ छ ॥

आर्यागीति.

हरि चिंती सज्जकरी धनु त्यापार्था सुबाहु कटकामुख तां।
कानीं वदे बळवितों क्षिप्रचि तुज जितसुबाहुकटका-
मुखतां ॥ ५२ ॥

गीति.

झोडो ओढो सोडो उडो कपी कायहीं करोका तें
रात्रि सेतु अर्जुन पुन्हां जानंदी रुकांद येक रोकातें ॥ ५३ ॥

राखी गूढपणें प्रभु शरसेत्वभरीं महारथाङ्गातें ॥
निज विजयें भुवन करी वीरा पार्था महारथागातें ॥ ५४ ॥

उडुनी शरसेतूवरि पडतां कंतुक तसाचि तो धरणीं ॥
कपि अपटे देवाची कवणासि कळे अतर्क्य जे करणी ॥ ५५ ॥

माता राघवदूतप्रवर वदे कथिशितेंचि माथरा ॥
पार्था राखिन विजयध्वजि करितों मीं द्विजोत्तमाथारा ॥ ५६ ॥

ओंवी. ( ग्रं० ).

अर्जुनास धरून वनमाळी ।
मारुतीचे हातीं देत तेवेळीं ॥
म्हणे यास तूं सांभाळीं ।
कृपा करोनी सर्वदां ॥ छ ॥

पद.

श्रीवर दावि निजाकृति तोषुनि ॥ श्रीगळ धातृमुखीं नुत जो जनि ॥ ध्रु० ॥ भावबळें वळला ज्ञणि पार्था ॥ भावितयांप्रति दे पुरुषार्था ॥ श्रीवर० ॥ १ ॥ चक्रदराब्जगदा वनमाला ॥ चारुकिरीट सुकुंडल ज्याला ॥ विक्रमि सारुनि गर्वतमाला ॥ मिश्रितमुखा दे हरुनि श्रमाला

श्रीवर० ॥ २ ॥ मारुतिलागि वदे तवँ राम ॥
मज कृष्णगणीं मेघश्याम ॥ हरुं असुरांप्रति धरुनी नेम ॥
आलों साधक हो बलभीम ॥ श्रीवर० ॥ ३ ॥ अर्जुन स-
ध्वजिं वसुनी तूंहटि ॥ गर्जुनियां खलसर्वहिं निवटीं ॥ नि-
र्जर हारिखाति जैसे पोटीं ॥ निजवाहुबळा प्रगटी किरीटी ॥
श्रीवर० ॥ ४ ॥ वदुनी द्वारवतीप्रति हरि ये ॥ वासुदेववि-
भु जो अज अव्यय ॥ वंदुनि मारुति तीर्थावळिशी ॥ साधु
निघे तों पांडव हौसीं ॥ श्रीवर० ॥ ५ ॥ ५७ ॥

गीति.

अघटितघटना करवी बरवी मति दे निजां भजनिं शिरवी
जिरवी मद पर हरवी सरवी क्षिण हरि यश जगीं भर-
वी ॥ ५८ ॥

---

श्रीरंगनाथकविसुत विनवी तो "वासुदेव" सुजनांला ।
कृष्णयशोन्वित ह्मणुनी अणावें चरित हें निजमनाला ॥

---

॥ संपूर्ण ॥

# जाहिर।

## फ ल क ल्प त रु.

तंजावर राजधानी येथें पूर्णचंद्रोदय छापखान्यांत कृष्णजोसी यानी केरळादि अनेक अपूर्व ग्रंथ शोधून, पुष्कळ स्वानुभवानेहीं केवल सर्व लोकोपकारार्थ अतिश्रमानें प्राद आर्याबद्ध फलकल्पतरु नामक ज्योतिष ग्रंथ रचिला आहे.

त्यांत दर कठिण पदांस व्याख्यारूपी विस्तार टीपादेऊन वरील ग्रंथ छापून विक्रीस तयार ठेविला आहे.

हा ग्रंथ येकवेळ अमुचे आर्यबंधू वाचून अनुभवघेणेलायख अशी अमची अनुभूत सूचना आहे. ग्रंथकर्त्यानें निरंतर यश व जनोपयोग यावर लक्षपुरवून याग्रंथाची किंमतहीं होईलतितुकी थोडी ठेविली आहे. शिवाय यांतील प्रतिसंज्ञेचे प्रस्तारास **महाचक्रोद्धारासह** सकृद्दर्शनीं ग्रंथाशयासह सर्व फलशास्त्राचा मुख्याशय मूर्तिमंत "करतलाऽमलकवत्" मुखपाठ फारसोपा होई असा ग्राहकांस फारच उपयोगी साधला आहे. कविता सरणी सुलभ व बोधपर असून, सुंदर टैपानी छापून तयार आहे. किंबहुना प्रत्यक्षाशिवाय अधीक लिहिणें सर्वांसारिखें होणार. आपला

**नारायण कृष्णाजी.**

म्यानेजर.

श्री

# ादय छापखाना.

श्रीवर० ॥ २

मज कृष्णगर्णें

## तंजावर.

आलों छापखान्यांत अनेकविध संस्कृत व मराठी नाटकें, धर्मग्रंथांच्या, कविता, पुराण, व शाळोपयोगी पुस्तकें इत्यादि विविध छापाईचें काम अत्युत्तमतऱ्हेनें व कम्मीमोलानें छापून देवूं.

प्रकृत छापून,

## विक्रीस तयार असलेलीं पुस्तकें:–

( तपालहांशील निराळी पडेल. )

१. रा० रा० रंगनाथकवि अंबेकर यांनी कृत, श्रीदामोदरतुलसीधात्री परिणय मंगलाष्टकें. .... किं०. ८-

२. वासुदेवरंगनाथ कवि अंबेकर कृत, फल्गुनाऽहंकृतिशम निरूपण. .... .... ,, ८=

३. हैदराबाद कृष्णजोसी अपशिंगीकर कृत, ज्योतिष फलकल्पतरु ( आर्याबद्ध. ) .... ,, रु० ।·

४. आदित्यपुराणोक्त आपदुद्धर हनुमत्स्तोत्र. ,, ८८६

**नारायण कृष्णाजी.**

म्यानेजर.